# मलयाळम् भाषा प्रवेश

## मराठी माध्यमाच्या द्वारा

संपादक-लेखक
प्राचार्य रा. बं. जोशी

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ

आंतरभारती : पुष्प १० वे



# मलयाळम् भाषा प्रवेश

## मराठी माध्यमाच्या द्वारा

संपादक–लेखक
प्राचार्य रा. बं. जोशी

महाराष्ट्र राज्य

महाराष्ट्र राज्य साहित्य–संस्कृति मंडळ
१९७६

## -: निवेदन :-

भारत हे बहुभाषी राष्ट्र आहे. भारताची राष्ट्रीय एकात्मता ही पश्चिमी देशातील 'एकराष्ट्र एकभाषा' अशा समीकरणाची नाही. येथे वैविद्यपूर्ण व साहित्यसंपन्न अशा १५ इतर भाषा आहेत. या भाषांची व साहित्याची वाढ मुख्यतः संस्कृत भाषेच्या व साहित्याच्या प्रभावाखाली झाली आहे. इंग्रजी राज्य झाल्यानंतरच्या काळात पश्चिमी संस्कृतीच्या, पश्चिमी ज्ञानाच्या व आधुनिक शिक्षणाच्या द्वारा विचार व भावना यांचे संवादित्व या भारतीय भाषांमध्ये निर्माण होऊ लागले आहे. स्वातंत्र्याच्या आंदोलनाने व राजकीय एकात्मतेमुळे या भाषांचे वैचारिक संबंध अधिक निकटचे बनले आहेत. परंतु या भाषांचा भाषिक सीमाप्रदेश सोडल्यास, अन्योन्यसंबंध फार थोडा आहे. परंपरागत धर्म आणि इंग्रजी भाषा यांच्या द्वारेच वैचारिक, भावनात्मक व सांस्कृतिक मूल्यांची देवघेव होत आहे. ही देवघेव मोठ्या प्रमाणात होणे आपल्या सांस्कृतिक प्रगतीचा वेग वाढविण्याच्या दृष्टीने आवश्यक आहेच. परंतु त्याहीपेक्षा भारताची राष्ट्रीय एकात्मता दृढ व अभेद्य बनविण्याकरिता अधिक आवश्यक आहे. याकरिता, महत्वाचा उपाय म्हणजे प्रादेशिक मातृभाषा बोलणाऱ्या लोकसमूहांमध्ये लगतच्या किंवा दूरच्या भारतीय प्रदेशांच्या भाषा उत्तम रीतीने अवगत केलेले, त्यापैकी एक किंवा अनेक भाषा उत्कृष्ट रीतीने लिहू किंवा बोलू शकणारे आणि त्याचप्रमाणे त्या त्या अन्य प्रादेशिक भाषेतील प्रथितयश लेखांचे, ग्रंथांचे व ग्रंथकारांचे साहित्य स्वतःच्या प्रादेशिक मातृभाषेत चांगल्या रीतीने भाषांतरित व रुपांतरित करण्यास समर्थ असलेले सुशिक्षित निर्माण होण्याची मोठी निकड आहे.

ही निकड भागविण्याची पहिली पायरी म्हणून महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळाने आपली "आंतरभारती"ची योजना आखली आहे. या योजनेप्रमाणे सुशिक्षित मराठी मनुष्यास गुजराती, उर्दू, बंगाली, कानडी इत्यादी इंडोआयर्न व द्राविडी भाषा स्वतंत्रपणे शिकता याव्या म्हणून प्रत्येक भाषेचे द्विभाषिक शब्दकोश (दोन्ही प्रकारचे म्हणजे गुजराती-मराठी, मराठी-गुजराती असे) भाषा प्रवेश आणि साहित्य-परिचय अशी चार पुस्तके प्रकाशित करण्याचे ठरविले आहे. या कार्यक्रमानुसार मंडळाच्या वतीने

'गुजराती-मराठी शब्दकोश', 'उर्दू-मराठी शब्दकोश', 'कन्नड-मराठी शब्दकोश, 'गुजराती भाषाप्रवेश' 'कन्नड साहित्य परिचय' 'तमिळ-मराठी शब्दकोश', 'मराठी-कन्नड शब्दकोश', 'कन्नड भाषा प्रवेश', 'बंगाली साहित्य परिचय', 'बंगाली भाषा प्रवेश' 'तमिळ भाषा प्रवेश', हे ग्रंथ आधीच प्रकाशित झाले असून अन्य काही भाषांचे द्विभाषिक शब्दकोश व साहित्य परिचय मुद्रणावस्थेत आहेत व काही संपादित होत आहेत.

मंडळाच्या आंतरभारती योजनेखाली "मलयाळम्-भाषा प्रवेश" प्रकाशित करताना मंडळास आनंद होत आहे. प्रस्तुत भाषा-प्रवेश प्राचार्य रा. बं. जोशी, भोपाळ यांनी मंडळासाठी संपादून तयार केला आहे. सदर भाषा प्रवेश मलयाळम् भाषेचे अध्ययन करण्यास मराठी वाचकांस उपयुक्त होईल असा मंडळाचा विश्वास आहे. प्राचार्य जोशी यांनी मोठ्या आस्थेने व परिश्रमपूर्वक हे काम केले याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे.

सचिवालय,
मुंबई - ४०००३२.
दिनांक २५ नोव्हेंबर १९७६
शके १८९८.

**लक्ष्मणशास्त्री जोशी,**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ.

# अनुक्रमणिका


| | | |
|---|---|---|
| | निवेदन | |
| | प्रस्तावना | |
| पाठ १ ला | विषय प्रवेश | १ |
| पाठ २ रा | मलयाळम् लिपि परिचय | ९ |
| | (१) व्यंजने | १० |
| | (२) स्वरचिन्हे | ११ |
| | (३) बाराखडचा | १३ |
| | (४) मलयाळम् लिपित वाचन | ३३ |
| पाठ ३ रा | मलयाळम् व्याकरण परिचय | ३५ |
| | (१) नामविचार | ३८ |
| | (२) विशेषण विचार | ५३ |
| | (३) क्रियापद विचार | ६४ |
| पाठ ४ था | अभ्यासासाठी मलयाळम् सार्थ वाक्ये | १०३ |
| पाठ ५ वा | भाषांतरासाठी मलयाळम् वाक्ये | १९८ |
| पा ६ वा | नित्यव्यवहारोपयोगी मलयाळम् शब्दसंग्रह | २४६ |
| | (१) संख्यावाचके | २४७ |
| | (२) वारांची नावे | २५२ |

| | | |
|---|---|---|
| | (३) महिन्यांची नावे | २५३ |
| | (४) दिशा | २५३ |
| | (५) धान्य | २५४ |
| | (६)खायच्या वस्तू | २५४ |
| | (७) फळे | २५६ |
| | (८) भाजी | २५७ |
| | (९) धातु | २५८ |
| | (१०) रंग | २५८ |
| | (११) धंदेवाले | २५९ |
| | (१२)अवयव | २६० |
| | (१३) जनावरे, पक्षी आदि | २६२ |
| | (१४) नातेवाईक | २६४ |
| पाठ ७ वा | नित्यव्यवहारोपयोगी मलयाळम् वाक्यसंग्रह | २६८ |
| | (१) निन्यव्यवहारोपयोगी वाक्यसंग्रह | २७० |
| | (२) मलयाळम् शब्दकोश | ३०२ |

# प्रस्तावना

महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृतिमंडळ यांच्या आंतरभारती प्रकाशन मालेकरिता "तमिऴ भाषा प्रवेश" हे पुस्तक मी तयार करून दिले होते. त्या पुस्तकाच्या नमुन्यावरून अन्य सर्व भारतीय भाषांची पुस्तके तयार करविण्याचे मंडळाने ठरविले, व मलयाळम् भाषेवरीलही पुस्तक मला मंडळाने तयार करावयास सांगितले. म्हणून हा "मलयाळम् भाषाप्रवेश" माझ्या पूर्वीच्या "तमिऴ भाषा प्रवेशा"च्या नमून्याप्रमाणेच मी तयार केला आहे. या पुस्तकातील उद्देश व भूमिका "तमिऴ भाषा प्रवेशा"तील उद्देश व भूमिकेप्रमाणेच आहे. हे पुस्तक सामान्य प्रौढ मराठी वाचकाकरिता असून नित्यव्यवहारोपयोगी मलयाळम् भाषेत बोलणे लिहिणे व वाचणे याचे सर्वसाधारण ज्ञान होण्यास जरूर ती सर्व माहिती या पुस्तकात दिली आहे. या पुस्तकाचा नमूना जरी सर्वसाधारणपणे "तमिऴ भाषा प्रवेशा"सारखाच असला, तरी तपशिलात फरक आहे. मलयाळम् भाषेची वैशिष्ट्ये लक्षात घेऊन त्यांच्या अनुरोधाने या पुस्तकाच्या तपशिलात जरूर ते फेरबदल केले आहेत. हे पुस्तक तयार करण्याच्या कामी गुंडर्ट : मलयाळम् भाषा व्याकरणम्, मेनन् मलयाऴम् सेल्फ टॉट, विद्यार्थी मलयाऴम् स्वयंशिक्षक, केशवन् नायर : ऑन्नाम् पाठ्यपुस्तकम्, फ्रोनमायर : मलयाऴम् ग्रामर फॉर युरोपियन्स, या पुस्तकांचा उपयोग झाला आहे. माझ्या माहितीप्रमाणे मराठीत मलयाऴम् भाषेवरील हे पहिलेच पुस्तक आहे. म्हणून हे पुस्तक सुधारण्याच्या दृष्टीने कोणी काही सूचना केल्यास त्या सूचनांचा दुसऱ्या आवृत्तीचा योग आल्यास ती आवृत्ती तयार करतेवेळी सादर व कृतज्ञतापूर्वक विचार केला जाईल. हे पुस्तक मराठी भाषिकांची मलयाऴम् भाषिकांशी थोडीशी तरी आंतरिक जवळिकता निर्माण करण्यास थोडेफार सहाय्यभूत ठरल्यास व या पुस्तकामुळे मराठी भाषिकांमध्ये मलयाऴम् भाषा, मलयाऴम् वाङ्मय, व केरळ संस्कृति यांच्या अभ्यासाची हौस निर्माण झाल्यास या पुस्तकाचा उद्देश सफल झाला असे मी समजतो.

लेखक

# विषय प्रवेश

मलयाळम् भाषा केरळ राज्यात बोलली जाते. केरळ राज्य हे उत्तरेस म्हैसूर राज्य, पूर्वेस मद्रास राज्य, पश्चिमेस अरबी समुद्र व दक्षिणेस हिंदी महासागर या चतुःसीमेत निसर्गसौंदर्याने नटलेला असा एक अतिशय रमणीय प्रांत आहे. आजकाल कथाकळी हे महाराष्ट्रात सर्वत्र परिचित व आवडते नृत्य झाले आहे. कथाकळीमुळे केरळ देश माहीत नाही असा सुसंस्कृत महाराष्ट्रीय सापडणे कठीण. कथाकळी हे केरळ संस्कृतीचे एक मोठे वैशिष्टय आहे. कित्येक केरळीय नृत्य प्रकारात कांही मलयाळम् पदेही गुंफलेली असतात. मलयाळम् नृत्य पाहाणारे व तसेच मलयाळम् नृत्य हौसेने शिकणारे शौकीनही महाराष्ट्रात वाढत आहेत. म्हणून या नृत्याच्या निमित्ताने त्यात गुंफलेल्या पदांची मल्याळम् भाषा महाराष्ट्रीयांच्या कानावरून जाण्याचा अनेक वेळा प्रसंग येतो. महाराष्ट्रीयांचा मलयाळम् भाषेशी असा प्रत्यक्षात संबंध येऊ लागला आहे. केरळ देश ही अद्वैतमताचे प्रवर्तक आदि शंकराचार्य यांची जन्मभूमी आहे. सर्व हिंदुस्थानभर शांकरपंथीय बहुसंख्य आहेत.

तसेच महाराष्ट्रातही आहेत. म्हणून महाराष्ट्रीयांना केरळ देशाबद्दल आत्मीयता वाटणे सहाजिक आहे. केरळची राजधानी त्रिवेंद्रम येथे अनंतशयनरूपातील विष्णूचे एक मोठे मंदिर आहे. त्याला पद्मनाभस्वामी मंदिर म्हणतात. या देवळा-वरूनच त्रिवेंद्रमचे मलयाळम् भाषेतील शुद्ध रूपातील तिरू अनंतपुरम हे नाव पडले आहे. हे हिंदूंचे पवित्र स्थान आहे. दरवर्षी सर्व हिंदुस्थानातून दक्षिणेत तीर्थयात्रेस येणारे अनेक भाविक येथे येऊन या अनंतशयन विष्णूचे दर्शन घेतल्याशिवाय रहात नाहीत. अशा यात्रेकरूंत अनेक महाराष्ट्रीयही असतात. महाराष्ट्राचा केरळ देशाशी असलेला हा धार्मिक दुवा पुरातन आहे. या शिवाय केरळीय माणसे जसे सर्व हिंदुस्थानभर नोकरीधंदयाच्या निमित्ताने पसरली आहेत, तशीच महाराष्ट्राची राजधानी मुंबई येथे व तसेच महाराष्ट्राचे शैक्षणिक व सांस्कृतिक केंद्र म्हणून गणल्या जाणाऱ्या पुण्यासारख्या अन्य मोठ्या शहरातही केरळीय माणसे बरीच आढळतात केरळीयांचा व महाराष्ट्रीयांचा संबंध दैनंदिन जीवनात येण्याचे प्रसंग वाढत आहेत. भारतातील सर्व प्रांतांमध्ये साक्षरता प्रसारात केरळ हा सर्वांत अग्रेसर प्रांत समजला जातो. तसेच शिक्षण-प्रसारातही हा अत्यंत पुढारलेला प्रांत आहे. केरळीय माणूस हा मूळचा प्रखर बुद्धिमत्तेचा असतो व त्यात त्याला चांगले शिक्षणही मिळालेले असते, कारण केरळातील बहुसंख्य शिक्षणसंस्था ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या आहेत व त्यांची शिक्षणपध्दति चांगली असते. शिवाय केरळीय माणूस हा परिश्रमी व काटकसरीने राहाणारा असतो. नशीब काढण्यासाठी जगावर कोठेही जाण्याचे साहस त्याच्याजवळ असते, व कोणत्याही देशात कोणत्याही परिस्थितीशी तो जुळवून घेतो. त्यांच्या प्रखर बुध्दिमत्तेला या सर्व गुणांची जोड मिळाल्यामुळे केरळीय माणसे भारतात व भारताबाहेर विविध क्षेत्रांत नेत्रोद्दीपक कीर्ति मिळवून तळपताना दिसतात. केरळातील स्त्रियाही इतर प्रांतांच्या मानाने शैक्षणिक व समाजजीवनात बऱ्याच पुढारलेल्या आहेत. म्हणून यांचे बौध्दिक व सांस्कृतिक जीवन कसे आहे हे पाहाण्याची उत्कंठा महाराष्ट्रीयांना असावी हे साहाजीक आहे.

केरळीयांचे आपल्या मातृभाषेवर अत्यंत कौतुकास्पद प्रेम आहे. मिशन-ऱ्यांच्या प्रभावाखाली ख्रिस्ती केरळीयांनीही जरी धर्म सोडला तरी मलयाळम्

भाषा व केरळीय संस्कृति यावरचे प्रेम त्यांनी सोडलेले नाही. विश्वविद्यालयीन शिक्षणाचा सर्व प्रांतापेक्षा केरळात जास्त प्रचार असताही बौध्दिक व सांस्कृतिक जीवनात इंग्रजीपेक्षा मलयाळम् भाषेचाच वरचष्मा आहे. तामिळनाडच्या अगदी विरुध्द परिस्थिती येथे आहे. तमिळनाडुमध्ये इंग्रजीचा अतोनात वरचष्मा आहे. निदान अगदी परवापर्यंत तरी अशी परिस्थिति होती असे म्हणण्यास मुळीच हरकत नाही. सध्या द्राविडनाडच्या चळवळीच्या परिणामामुळे तामिळनाडुमध्ये इंग्रजीपेक्षा तामिळभाषेला थोडे जास्त महत्व येऊ लागले आहे हे मात्र खरे. तरी पण इंग्रजीचे स्थान तामिळनाडुमध्ये सध्याही अजून बरेच महत्वाचे आहे. म्हणून केरळमधील बौध्दिक व सांस्कृतिक जीवनातील मलयाळम् भाषेचे महत्त्व पाहाता केरळीय बौध्दिक व सांस्कृतिक जीवन समजून घेण्यास मल्याळम् भाषा शिकण्याची अत्यंत आवश्यकता आहे. अलीकडे महाराष्ट्रीयांमध्ये अन्यभाषिक साहित्यांतील रुची वाढत आहे हे दैनिके व नियतकालिके यांमधील भाषांतरित वाङमयाच्या वाढत्या प्रमाणावरून स्पष्ट दिसून येते. या दृष्टीने पाहाता मलयाळम् भाषेतील समृध्द वाङ्मय हे महाराष्ट्रीयांना ही भाषा शिकण्यास एक मोठे प्रलोभनच आहे.

**भाषा** : तमिळ, तेलुगु, कन्नड व मलयाळम् अशा ज्या चार प्रमुख साहित्यिसमृध्द द्राविडी भाषा आहेत त्यांपैकी मलयाळम् ही एक आहे. मलयाळम् भाषा तमिळ भाषेला फार जवळची आहे. मल्याळम् लिपी व तमिळ लिपी यातही बरेच साम्य आहे. ऐतिहासिक दृष्ट्या केरळ हा पूर्वी तमिळनाडुचाच एक भाग होता. म्हणून तमिळचा प्रभाव मलयाळम् भाषेवर साहाजीकच जास्त दिसून येतो. मलयाळम्भाषिकांना तमिळ व तमिळभाषिकांना मलयाळम् शिकणे फारच सोपे जाते. तमिळ व मलयाळम् या भाषांचा एकमेकाशी इतका जवळचा संबंध आहे.

मराठीभाषिकांच्या दृष्टीने या चारही द्राविडी भाषांपैकी तमिळ ही सर्वात अवघड व मलयाळम् सर्वात सोपी असे मानावयास हरकत नाही. कन्नड व तेलुगु या द्राविडी भाषांचा प्रदेश महाराष्ट्राशी भिडला असल्यामुळे व सीमा भागातील महाराष्ट्रीय दोन्ही भाषा जाणू शकत असल्यामुळे या भाषा मलयाळम्-पेक्षा सोप्या आहेत असा महाराष्ट्रीयांचा समज होण्याचा संभव आहे. पण तो

समज या भाषांच्या सान्निध्यामुळे व संबंधामुळे निर्माण झालेला आहे. खरे पाहाता तो समज चुकीचा आहे. या तिन्ही भाषा तौलनिक दृष्टीने पाहिल्यास मलयाळम् भाषेचे व्याकरण या सर्वांत सोपे आहे. तसेच तेलुगु व कन्नड या दोन भाषांत संस्कृत शब्दांचा भरणा हा जो परिचित व सोपा भाग वाटतो तो भाग मलयाळम् भाषेतही आहे. म्हणून मलयाळम् भाषा या सर्वांत सोपी आहे.

**वर्णमाला :**

मलयाळम् वर्णमाला साधारणपणे मराठीसारखीच आहे. पण पुढे दिलेले फरक मराठी वाचकांनी लक्षात ठेवावेत.

[अ] मराठी ए व ओ या स्वरांत ऱ्हस्व व दीर्घ असा फरक नाही. पण मलयाळम् भाषेत तसा फरक आहे. मलयाळम् भाषेमध्ये दोन ए [एक ऱ्हस्व व एक दीर्घ] व दोन ओ एक ऱ्हस्व व एक दीर्घ आहेत, व त्याकरिता मलयाळम् लिपीत तशी स्वतंत्र अक्षरेही आहेत. मलयाळम् दीर्घ ए ഏ व ओ ഓ यांचा उच्चार साधारणपणे मराठी ए व ओ यांच्यासारखाच आहे. पण मल्याळी ऱ्हस्व ए എ व ओ ഒ यांचा उच्चार एकमात्रक असून दीर्घ ए ഏ व ओ ഓ यांच्यासारखाच करावयाचा असतो. पण तो दीर्घ ए ഏ व ओ ഓ यांच्या उच्चाराला लागणाऱ्या वेळेपेक्षा कमी वेळात (म्हणजे एक मात्रा इतका) उच्चारावयाचा असतो. बोलण्यातील विकृत रूपात ऱ्हस्व ए എ व ऱ्हस्व ओ ഒ यांचे उच्चार अनुक्रमे काहीसे मराठी य व व यांच्यासारखे वाटतात. या पुस्तकात ऱ्हस्व ए എ व ऱ्हस्व ओ ഒ ही अक्षरे त्यांच्या वर एक उलटी मात्रा देऊन ॶ व ॵ अशी दाखविली गेली आहेत.

(ब) मलयाळम् भाषेत क ക, च ച, ट ട, त ത, प പ, यांचे प्रत्येकी दोन उच्चार आहेत. जेव्हा हे शब्दाचे आद्याक्षर असतात, तेव्हा यांचा मूळचाच म्हणजे क, च, ट, त, प, असाच उच्चार होतो. जेव्हा हे शब्दाचे आद्याक्षर नसून अन्यस्थानी म्हणजे शब्दाच्या मध्ये वा अंती असतात, तेव्हा यांचा उच्चार अनुक्रमे ग, ज, ड, द, ब असा होतो. पण हे शब्दाच्या मध्ये वा अंती असूनही द्वित्व पावले असतील म्हणजे क्क ക്ക, च्च ച്ച, ट्ट ട്ട, त्त ത്ത, प्प പ്പ, असे असतील तर यांचा मूळचाच उच्चार राहातो, म्हणजे क्क , च्च, ट्ट, त्त, प्प असाच उच्चार होतो.

(क) मलयाळम् भाषेत न ന याचेही दोन उच्चार आहेत--(१) दंत्य न व (२) तालव्य न या दोन्ही उच्चारामध्ये थोडासा सूक्ष्म फरक आहे. परंतु तो फारसा जाणवण्यासारखा नाही. शिवाय मलयाळम् लिपीत त्या दोन्हीना एकच अक्षर आहे. यामुळे उच्चारभेद लक्षात न राहिल्यास लिहिण्यात चूक होण्याचा संभव नाही. म्हणून याकडे सुरुवातीस फारसे लक्ष देण्याचे कारण नाही. पण अगदी शुध्द उच्चारावर जेव्हा विशेष लक्ष देणे या भाषेच्या प्रगत अभ्यासात जरूर वाटेल तेव्हा याकडे लक्ष द्यावे. पण व्यवहारातल्या बोलण्यात या उच्चारभेदाकडे फारसे लक्ष देण्याचे कारण नाही.

(ड) मलयाळम् भाषेत दोन र आहेत. त्यांच्या उच्चारात थोडासा फरकही आहे. पण हा फरक चांगला जाणवण्यासारखा असल्यामुळे तो चांगला लक्षात ठेवावा. शिवाय या दोन र ना मलयाळम् लिपित वेगवेगळी दोन स्वतंत्र अक्षरे आहेत, व त्यापैकी एका र च्या स्थानी दुसरा र लिहिल्यास लिहिण्यातील ती मोठी चूक मानली जाते. म्हणून याकडे सुरूवाती पासूनच विशेष लक्ष द्यावे. एखाद्या वेळेस बोलण्यात दोन र मधील उच्चारभेदाकडे दुर्लक्ष केल्यास चालेल, पण लिहिण्यात मात्र एक र ची दुसऱ्या र शी गल्लत करून चालणार नाही. म्हणून उच्चारभेद लक्षात राहिल्यास एका र चा दुसऱ्या र शी गल्लत होण्याचा संभव उद्भवणार नाही. यापुस्तकात ര व റ या दोन मलयाळम् र मधील फरकखाली टिंब देऊन र ര व ऱ റ असा दाखविला आहे. या ऱ റ चा उच्चार र ര चे व्दित्व झाल्यासारखा होतो, म्हणजे साधारण पणे तर व तर्र यामधील र व र्र यांच्या उच्चारात जो भेद आहे तोच भेद मल्याळी र ര व ऱ यांच्या उच्चारात आहे.

(इ) मलयाळम् भाषेमध्ये आणखीन एक अक्षर आहे की जे मराठीत नाही. याचा उच्चार फारच कठीण आहे. हे अक्षर व याचा विशिष्ट उच्चार हा मलयाळम् भाषेचा विशेष आहे. हा उच्चार केरळीय लोक बोलतांना प्रत्यक्ष ऐकलाच पाहिजे, व नंतरच बरोबर कल्पना येईल. हे अक्षर मलयाळम् लिपीत ഴ असे लिहिले जाते, व ते या पुस्तकात ष़ या अक्षराने दाखविले आहे. याचा उच्चार मराठी ल व ळ यांच्या मधला आहे जीभ वर तालूच्या मागील भागास लावून हळूच पुढे आणल्यास हा ध्वनी निघतो, किंवा मराठी ष

याचा उच्चार करण्यास जीभ तालूस ज्या ठिकाणी लावावी लागते त्याठिकाणी लावून मराठी र चा उच्चार करण्याचा प्रयत्न केल्यास हा ध्वनी साधारणपणे मिळेल. त्याचा उच्चार मराठी ळ प्रमाणे पण नेहमीच्या ळ पेक्षा थोडासा अस्पष्ट व थोडा ज मिश्रित केल्यास जवळ जवळ बरोबर येईल. काही केरळीय लोकांच्या उच्चारात हे अक्षर सरळ मराठी ळ प्रमाणे उच्चारलेलेही आढळेल. हा जरी शास्त्रशुध्द उच्चार नसला तरी सामान्य लोकात निदान केरळ राज्याच्या काही विशिष्ट भागात तरी बराच प्रचलित आहे. याचा शास्त्रशुद्ध उच्चार अर्थातच मराठी वाचकांस उच्चार करण्यास बराच अवघड वाटेल, व याचा ध्वनी कानासही बराच अपरिचित वाटेल.

**पुस्तकरचना :**

या पुस्तकाच्या या प्रकरणात मलयाळम् भाषेच्या स्वरूपासंबंधी थोडीशी सामान्य माहिती देऊन पुढील दुसऱ्या प्रकरणात मलयाळम् लिपीचा परिचय करून दिला आहे. मलयाळम् लिपीतील वाचन हे वर (ब) मध्ये सांगितलेल्या मलयाळम् भाषेच्या उच्चाराच्या वैशिष्ट्यामुळे मराठीपेक्षा थोडेसे अवघड वाटेल हे खरे. तरी पण जेथे जेथे म्हणून मलयाळम् शब्द वा वाक्य या पुस्तकात आले आहे तेथे तेथे सर्वत्र तोच शब्द वा तेच वाक्य पुढे मलयाळम् लिपीतही दिले आहे. या मलयाळम् लिपीचा भाग वगळूनही या पुस्तकाचा अभ्यास करता येण्यासारखा आहे. तरीपण मलयाळम् लिपीतील भागासहित या पुस्तकाचा अभ्यास केल्यास मलयाळम् लिपीतील वाचनाचा आपोआपच चांगला सराव होऊन जाईल, व असा भाग या पुस्तकात खूपच असल्यामुळे इतक्या सरावानंतर मलयाळम् लिपीत सहज वाचन करता येईल अशी आशा आहे. प्रथमच मलयाळम् लिपीच्या भागासहित या पुस्तकाचा अभ्यास करणे अवघड वाटल्यास प्रथम तो भाग वगळून, नागरी लिपीतूनच मलयाळम् भाषेचा परिचय करून घेऊन, नंतर मलयाळम् लिपीच्या भागासहित पुनः या पुस्तकाचा लिपीपरिचयाच्या दृष्टीने अभ्यास केल्यासही चालण्यासारखे आहे. प्रथम मलयाळम् भाषेचा परिचय झाल्यावर नंतर मलयाळम् लिपीत वाचनाचा सराव करून घेणे हे सोपे आहे. लिपिपरिचयाबाबत या दोन प्रकारांपैकी जो प्रकार वाचकांस सोईचा वाटेल त्या प्रकाराने वाचकांनी अभ्यास करावा. लिहिण्याच्या सरावासाठी दुसऱ्या

प्रकरणातील दिलेल्या लिपिपरिचयाचा चांगला अभ्यास करून ४, ५, व ७ या प्रकरणातील मलयाळम् वाक्ये मलयाळम्मध्ये वारंवार लिहून काढावीत. यानंतर तिसऱ्या प्रकरणात मलयाळम् भाषेचे सामान्य ज्ञान होण्यास आवश्यक तेवढी व्याकरणाची माहिती दिली आहे. या व्याकरणाच्या माहितीचा वाक्यरचनेत प्रत्यक्ष कसा उपयोग होतो याचा परिचय होऊन एवढ्या मलयाळम् व्याकरणाचा चांगला सराव व्हावा म्हणून चौथ्या प्रकरणात काही मलयाळम् वाक्ये अभ्यासासाठी दिली आहेत. ही मलयाळम् वाक्ये मराठी अर्थासह दिली असल्यामुळे काही सार्थ मलयाळम् शब्दसंग्रहही वाचकांच्या चांगल्याच परिचयाचा होईल. या प्रकरणाच्या शेवटी दिलल्या 'उजळणी' वरून वाचकांना आपल्याला परिचित झालेल्या शब्दसंग्रहाचा अंदाज कळेल. पाचव्या प्रकरणात मराठीत भाषांतर करून आपल्या ज्ञानाचा अंदाज घेण्यासाठी मलयाळम् वाक्ये दिली आहेत, व त्यांचे मराठी भाषांतरही प्रकरणाच्या शेवटी दिले आहे. हे प्रकरण परीक्षेसाठी असल्यामुळे मागल्या प्रकरणाप्रमाणे मराठी भाषांतर मलयाळम् वाक्यांच्या जवळच दिलेले नाही. पण वाचकांस मराठी भाषांतरास मदत म्हणून या प्रकरणातील मलयाळम् वाक्यांत नवीन आलेल्या मलयाळम् शब्दांचे अर्थ तेथेच तळटीपांत दिले आहेत. मागल्या प्रकरणाप्रमाणे उपयोग करण्यासाठी या प्रकरणाच्याही शेवटी 'उजळणी' दिली आहे. सहाव्या प्रकरणात नित्यव्यवहारात उपयोगी होईल असा शब्दसंग्रह दिलेला आहे; व सातव्या प्रकरणात तशाच प्रकारचा वाक्यसंग्रहही दिलेला आहे. या दोन्ही प्रकरणातील माहितीचा नित्यव्यवहारात उपयोगी पडणाऱ्या शब्दांच्या व वाक्यांच्या संदर्भ याद्यावजा (*ready reference*) करिता चांगला उपयोग होण्यासारखा आहे. पण ही माहिती देखील इतर प्रकरणातील माहितीप्रमाणेच काळजीपूर्वक अभ्यासून आत्मसात करावी.

या पुस्तकात व्याकरण हे, थोडे नियम, त्यांची उदाहरणरूप वाक्ये व तेवढ्याच व्याकरणाचा (परीक्षा व उजळणी करिता) 'अभ्यास'रूप भाग प्रत्येक धड्यात देऊन तसे सर्व धडे क्रमवार रचून खंडशः (*analytic*) येथे शिकविलेले नाही. येथे या पुस्तकात द्यावयाची सर्व व्याकरणाची माहिती प्रथम एकत्रित देऊन मलयाळम् भाषेच्या व्याकरणाच्या स्वरूपाचे दर्शन वाचकांना

प्रथम साकल्याने (*synoptico–synthetic*) करून दिले आहे, व नंतर तीच सर्व व्याकरणाची माहिती वाक्यरूपातून व मधून मधून बराच संभाषणात्मक भाग घालून (*direct method*) शिकविलेली आहे. या पुस्तकात अवलंबिलेली ही पध्दती अशी संमिश्र स्वरूपाची आहे. नेहमीच्या पद्धतीपेक्षा ही पध्दती प्रौढ वाचकांस जास्त उपयोगी पडेल असे वाटते. नेहमीची पध्दती परभाषाविषयक शाळकरी अभ्यासक्रमाच्या दृष्टीने (*class - room use*) शाळकरी विद्यार्थ्यांना विशेष उपयुक्त आहे. तसेच अशा अभ्यासास जरूर तितके नियमित दैनंदिन शाळकरी परिश्रम करण्याची ज्यांना शक्यता आहे व ज्यांना तितका वेळ मिळतो अशांनाही ती पद्धती विशेष उपयुक्त आहे, व त्या दृष्टीने त्या पध्दतीचे तसे काही विशेष फायदेही आहेत. पण सामान्य प्रौढ वाचकांस आपल्या नेहमीच्या व्यवसायातून फुरसतीच्या वेळी अभ्यास करण्यास त्या पद्धतीपेक्षा येथील हीच पद्धती जास्त सोयीस्कर व फायदेशीर वाटेल असे वाटते. शिवाय नेहमीच्या शाळकरी पद्धतीत पाठांतरावर खूप भर असतो. येथे पाठांतरावर तितकासा भर दिलेला नाही. येथे समजून घेऊन (*Understanding*) अभ्यास करण्यावर ज्यास्त भर दिलेला असून पाठांतरावर (*Learning by heart*) शक्य तितका कमी भर देण्याचा प्रयत्न केला आहे. प्रौढ वाचकास शाळकरी विद्यार्थ्यांप्रमाणे पाठांतराचे काम जमत नाही. म्हणून प्रौढ वाचकांस ही पद्धती विशेष सोईची वाटेल. हे पुस्तक सामान्य मराठी प्रौढ वाचकांकरिता आहे. म्हणून ही अशी संमिश्र पद्धती येथे मुद्दाम अवलंबिलेली आहे.

# २ मलयाळम् लिपि परिचय

स्वर

| അ | ആ | ഇ | ഈ |
|---|---|---|---|
| अ | आ | इ | ई |
| ഉ | ഊ | ഋ | എ |
| उ | ऊ | ऋ | ऍ |
| ഏ | ഐ | ഒ | ഓ |
| ए | ऐ | ऑ | ओ |
| ഔ | അം | അഃ | |
| औ | अं | अः | |

## व्यंजने

| ക | ഖ | ഗ | ഘ | ങ |
|---|---|---|---|---|
| क | ख | ग | घ | ङ |
| ച | ഛ | ജ | ഝ | ഞ |
| च | छ | ज | झ | ञ |
| ട | ഠ | ഡ | ഢ | ണ |
| ट | ठ | ड | ढ | ण |
| ത | ഥ | ദ | ധ | ന |
| त | थ | द | ध | न |
| പ | ഫ | ബ | ഭ | മ |
| प | फ | ब | भ | म |
| യ | ര | ല | വ | ശ |
| य | र | ल | व | श |
| ഷ | സ | ഹ | ള | ഴ |
| ष | स | ह | ळ | ष़ |
| | | റ | | |
| | | ऱ | | |

## स्वरचिन्हे

| | मराठी | मल्याळम् |
|---|---|---|
| आकार | ा | ാ |
| इकार | ि | ി |
| ईकार | ी | ീ |
| उकार | ु | ു |
| ऊकार | ू | ൂ |
| ऋकार | ृ | ൃ |
| अॅकार | ॅ | െ |
| एकार | े | േ |
| ऐकार | ै | ൈ |
| आकार | ॉ | ൊ |
| ओकार | ो | ോ |
| औकार | ौ | ൌ |
| अनुस्वार | ं | ം |
| विसर्ग | ः | ഃ |
| अर्धाक्षर चिन्ह | ् | ് |
| अतिऱ्हस्व उकार | ॅ | ു് |

(अ) मराठीत व्यंजनाचा स्वरांशी संयोग होऊन बनणारी जी बारा रूपे साधारणपणे देतात त्यांना बाराखड्या म्हणतात. मलयाळम् लिपीत अशी पंधरा रूपे असल्यामुळे त्यांना पंधराखड्या म्हणणे योग्य होईल. तरीपण मराठी रूढीनुसार त्यांना येथे बाराखड्याच म्हटले आहे.

(ब) अतिऱ्हस्व उॅ हा मलयाळम्‌चा एक विशेष आहे व याचा उच्चार जवळ जवळ अ सारखाच पण अगदी किंचित् उ – मिश्रित असा होतो. असा उच्चार असलेला ऱ्हस्व उ फक्त शब्दाच्या अंती येतो.

(क) वरील स्वरचिन्हांपैकी उकाराचे मलयाळम् चिन्ह ु व ऊकाराचे मलयाळम् चिन्ह ू ही चिन्हे काही व्यंजनांच्या बाबतीत आढळत नाहीत, व यांच्या ऐवजी वेगळीच चिन्हे वापरतात. म्हणून या चिन्हांच्या बाबतीतील बदल पुढील बाराखड्यांच्या तक्त्यात चांगले लक्षपूर्वक पाहून ठेवावेत.

(ड) काही अर्धाक्षरे म्हणजे स्वररहित व्यंजने लिहिण्यासाठी वरील अर्धाक्षरचिन्हाचा उपयोग सहसा करीत नाहीत, कारण काही व्यंजनांची स्वररहित म्हणजे अर्धाक्षर रूपे लिहिण्यासाठी जी स्वतंत्र अक्षरे आहेत त्यांचा उपयोग करतात. अशी स्वतंत्र अक्षरे असणाऱ्या व्यंजनांची अर्धाक्षररूपे पुढे "अर्धाक्षरे व जोडाक्षरे" यामध्ये दिलेली आहेत ती चांगली लक्षपूर्वक पाहून ठेवावीत.

(ई) संस्कृतमधील दीर्घ ॠ, ऱ्हस्व ऌ व दीर्घ ॡ यांना मलयाळम् लिपीत अनुक्रमे

ൠ (याचे व्यंजनांच्या बाराखडयांत वापरण्याचे चिन्ह ൄ असे आहे — उदा० ഘൄ = घॄ), ഌ (याचे व्यंजनांच्या बाराखडया वापरण्याचे चिन्ह ൢ असे आहे — उदा० ഘൢ = घॢ ), व ൡ (याचे व्यंजनांच्या बाराखडयांत वापरण्याचे चिन्ह ൣ असे आहे — उदा० ഘൣ = घॣ) अशी अक्षरे आहेत पण या अक्षरांचा सहसा उपयोग करण्याची जरूरी भासत नाही. म्हणून ही अक्षरे नेहमीच्या वापरात नाहीत.

# बाराखड्या

| ക | ഖ | ഗ | ഘ | ങ |
|---|---|---|---|---|
| क | ख | ग | घ | ङ |
| കാ | ഖാ | ഗാ | ഘാ | ങാ |
| का | खा | गा | घा | ङा |
| കി | ഖി | ഗി | ഘി | ങി |
| कि | खि | गि | घि | ङि |
| കീ | ഖീ | ഗീ | ഘീ | ങീ |
| की | खी | गी | घी | ङी |
| കു | ഖു | ഗു | ഘു | ങു |
| कु | खु | गु | घु | ङु |
| കൂ | ഖൂ | ഗൂ | ഘൂ | ങൂ |
| कू | खू | गू | घू | ङू |
| കൃ | ഖൃ | ഗൃ | ഘൃ | ങൃ |
| कृ | खृ | गृ | घृ | ङृ |

| കെ | ഖെ | ഗെ | ഘെ | ങെ |
|---|---|---|---|---|
| कॆ | खॆ | गॆ | घॆ | ङॆ |
| കേ | ഖേ | ഗേ | ഘേ | ങേ |
| के | खे | गे | घे | ङे |
| കൈ | ഖൈ | ഗൈ | ഘൈ | ങൈ |
| कै | खै | गै | घै | ङै |
| കൊ | ഖൊ | ഗൊ | ഘൊ | ങൊ |
| कॊ | खॊ | गॊ | घॊ | ङॊ |
| കോ | ഖോ | ഗോ | ഘോ | ങോ |
| को | खो | गो | घो | ङो |
| കൌ | ഖൌ | ഗൌ | ഘൌ | ങൌ |
| कौ | खौ | गौ | घौ | ङौ |
| കം | ഖം | ഗം | ഘം | ങം |
| कं | खं | गं | घं | ङं |
| കഃ | ഖഃ | ഗഃ | ഘഃ | ങഃ |
| कः | खः | गः | घः | ङः |

ച ഛ ജ ഝ ഞ

च छ ज झ ञ

ചാ ഛാ ജാ ഝാ ഞാ

चा छा जा झा ञा

ചി ഛി ജി ഝി ഞി

चि छि जि झि ञि

ചീ ഛീ ജീ ഝീ ഞീ

ची छी जी झी ञी

ചു ഛു ജു ഝു ഞു

चु छु जु झु ञु

ചൂ ഛൂ ജൂ ഝൂ ഞൂ

चू छू जू झू ञू

ചൃ ഛൃ ജൃ ഝൃ ഞൃ

चृ छृ जृ झृ ञृ

ചെ ഛെ ജെ ഝെ ഞെ

चॆ छॆ जॆ झॆ ञॆ

ചേ ഛേ ജേ ഝേ ഞേ

चे छे जे झे ञे

ചൈ ഛൈ ജൈ ഝൈ ഞൈ

चै छै जै झै ञै

ചൊ ഛൊ ജൊ ഝൊ ഞൊ

चॊ छॊ जॊ झॊ ञॊ

ചോ ഛോ ജോ ഝോ ഞോ

चो छो जो झो ञो

ചൌ ഛൌ ജൌ ഝൌ ഞൌ

चौ छौ जौ झौ ञौ

ചം ഛം ജം ഝം ഞം

चं छं जं झं ञं

ചഃ ഛഃ ജഃ ഝ; ഞഃ

चः छः जः झः ञः

ട ഠ ഡ ഢ ണ

ट ठ ड ढ ण

ടാ ഠാ ഡാ ഢാ ണാ

टा ठा डा ढा णा

ടി ഠി ഡി ഢി ണി

टि ठि डि ढि णि

ടീ ഠീ ഡീ ഢീ ണീ

टी ठी डी ढी णी

ടു ഠു ഡു ഢു ണു

टु ठु डु ढु णु

ടൂ ഠൂ ഡൂ ഢൂ ണൂ

टू ठू डू ढू णू

ടൃ ഠൃ ഡൃ ഢൃ ണൃ

टृ ठृ डृ ढृ णृ

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ടെ | ഠെ | ഡെ | ഢെ | ണെ |
| टॆ | ठॆ | डॆ | ढॆ | णॆ |
| ടേ | ഠേ | ഡേ | ഢേ | ണേ |
| टे | ठे | डे | ढे | णे |
| ടൈ | ഠൈ | ഡൈ | ഢൈ | ണൈ |
| टै | ठै | डै | ढै | णै |
| ടൊ | ഠൊ | ഡൊ | ഢൊ | ണൊ |
| टॊ | ठॊ | डॊ | ढॊ | णॊ |
| ടോ | ഠോ | ഡോ | ഢോ | ണോ |
| टो | ठो | डो | ढो | णो |
| ടൌ | ഠൌ | ഡൌ | ഢൌ | ണൌ |
| टौ | ठौ | डौ | ढौ | णौ |
| ടം | ഠം | ഡം | ഢം | ണം |
| टं | ठं | डं | ढं | णं |
| ടഃ | ഠഃ | ഡഃ | ഢഃ | ണഃ |
| टः | ठः | डः | ढः | णः |

ത ഥ ദ ധ ന

त थ द ध न

താ ഥാ ദാ ധാ നാ

ता था दा धा ना

തി ഥി ദി ധി നി

ति थि दि धि नि

തീ ഥീ ദീ ധീ നീ

ती थी दी धी नी

തു ഥു ദു ധു നു

तु थु दु धु नु

തൂ ഥൂ ദൂ ധൂ നൂ

तू थू दू धू नू

തൃ ഥൃ ദൃ ധൃ നൃ

तृ थृ दृ धृ नृ

തെ ഥെ ദെ ധെ നെ

तॆ थॆ दॆ धॆ नॆ

തേ ഥേ ദേ ധേ നേ

ते थे दे धे ने

തൈ ഥൈ ദൈ ധൈ നൈ

तै थै दै धै नै

തൊ ഥൊ ദൊ ധൊ നൊ

तॊ थॊ दॊ धॊ नॊ

തോ ഥോ ദോ ധോ നോ

तो थो दो धो नो

തൌ ഥൌ ദൌ ധൌ നൌ

तौ थौ दौ धौ नौ

തം ഥം ദം ധം നം

तं थं दं धं नं

തഃ ഥഃ ദഃ ധഃ നഃ

तः थः धः दः नः

പ ഫ ബ ഭ മ

प फ ब भ म

പാ ഫാ ബാ ഭാ മാ

पा फा बा भा मा

പി ഫി ബി ഫി മി

पि फि बि भि मि

പീ ഫീ ബീ ഭീ മീ

पी फी बी भी मी

പു ഫു ബു ഭു മു

पु फु बु भु मु

പൂ ഫൂ ബൂ ഭൂ മൂ

पू फू बू भू मू

പൃ ഫൃ ബൃ ഭൃ മൃ

पृ फृ बृ भृ मृ

| | | | | |
|---|---|---|---|---|
| പെ | ഫെ | ബെ | ഭെ | മെ |
| पॆ | फॆ | बॆ | भॆ | मॆ |
| പേ | ഫേ | ബേ | ഭേ | മേ |
| पे | फे | बे | भे | मे |
| പൈ | ഫൈ | ബൈ | ഭൈ | മൈ |
| पै | फै | बै | भै | मै |
| പൊ | ഫൊ | ബൊ | ഭൊ | മൊ |
| पॊ | फॊ | बॊ | भॊ | मॊ |
| പോ | ഫോ | ബോ | ഭോ | മോ |
| पो | फो | बो | भो | मो |
| പൌ | ഫൌ | ബൌ | ഭൌ | മൌ |
| पौ | फौ | बौ | भौ | मौ |
| പം | ഫം | ബം | ഭം | മം |
| पं | फं | बं | भं | मं |
| പഃ | ഫഃ | ബഃ | ഭഃ | മഃ |
| पः | फः | बः | भः | मः |

യ ര ല വ ശ

य र ल व श

യാ രാ ലാ വാ ശാ

या रा ला वा शा

യി രി ലി വി ശി

यि रि लि वि शि

യീ രീ ലീ വീ ശീ

यी री ली वी शी

യു രു ലു വു ശു

यु रु लु वु शु

യൂ രൂ ലൂ വൂ ശൂ

यू रू लू वू शू

യൃ രൃ ലൃ വൃ ശൃ

यृ रृ लृ वृ शृ

യെ രെ ലെ വെ ശെ

यॆ रॆ लॆ वॆ शॆ

യേ രേ ലേ വേ ശേ

ये रे ले वे शे

യൈ രൈ ലൈ വൈ ശൈ

यै रै लै वै शै

യൊ രൊ ലൊ വൊ ശൊ

यॊ रॊ लॊ वॊ शॊ

യോ രോ ലോ വോ ശോ

यो रो लो वो शो

യൌ രൌ ലൌ വൌ ശൌ

यौ रौ लौ वौ शौ

യം രം ലം വം ശം

यं रं लं वं शं

യഃ രഃ ലഃ വഃ ശഃ

यः रः लः वः शः

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ഷ | സ | ഹ | ള | ഴ | റ |
| ष | स | ह | ळ | ष़ | ऱ |
| ഷാ | സാ | ഹാ | ളാ | ഴാ | റാ |
| षा | सा | हा | ळा | ष़ा | ऱा |
| ഷി | സി | ഹി | ളി | ഴി | റി |
| षि | सि | हि | ळि | ष़ि | ऱि |
| ഷീ | സീ | ഹീ | ളീ | ഴീ | റീ |
| षी | सी | ही | ळी | ष़ी | ऱी |
| ഷു | സു | ഹു | ളു | ഴു | റു |
| षु | सु | हु | ळु | ·षु | ऱु |
| ഷൂ | സൂ | ഹൂ | ളൂ | ഴൂ | റൂ |
| षू | सू | हू | ळू | ·षू | ऱू |
| ഷൃ | സൃ | ഹൃ | ളൃ | ഴൃ | റൃ |
| षृ | सृ | हृ | ळृ | ·षृ | ऱृ |

| ഷെ | സെ | ഹെ | ളെ | ഴെ | റെ |
|---|---|---|---|---|---|
| षॆ | सॆ | हॆ | ळॆ | .षॆ | ऱॆ |
| ഷേ | സേ | ഹേ | ളേ | ഴേ | റേ |
| षे | से | हे | ळे | .षे | ऱे |
| ഷൈ | സൈ | ഹൈ | ളൈ | ഴൈ | റൈ |
| षै | सै | है | ळै | .षै | ऱै |
| ഷൊ | സൊ | ഹൊ | ളൊ | ഴൊ | റൊ |
| षॊ | सॊ | हॊ | ळॊ | .षॊ | ऱॊ |
| ഷോ | സോ | ഹോ | ളോ | ഴോ | റോ |
| षो | सो | हो | ळो | .षो | ऱो |
| ഷൌ | സൌ | ഹൌ | ളൌ | ഴൌ | റൌ |
| षौ | सौ | हौ | ळौ | .षौ | ऱौ |
| ഷം | സം | ഹം | ളം | ഴം | റം |
| षं | स | हं | ळं | .षं | ऱं |
| ഷഃ | സഃ | ഹഃ | ളഃ | ഴഃ | റഃ |
| षः | सः | हः | ळः | .षः | ऱः |

**अर्धाक्षरे** : मलयाळम् लिपीत काही व्यंजनांचे स्वररहित रूप म्हणजे अर्धाक्षर लिहिताना काही स्वतंत्र अक्षराचा वापर करतात हे मागे आलेच आहे. अशी अक्षरे खाली दिली आहेत. ती लक्षपूर्वक चांगली पाहून ठेवावीत.

अर्धाक्षरे : —

| | | |
|---|---|---|
| क् - ൿ | ण् - ൺ | न् - ൻ |
| र् - ർ | ल् - ൽ | ळ् - ൾ |

(अन्य सर्व व्यंजनाची अर्धाक्षरे ് या चिन्हाचा उपयोग करून लिहितात. उदा. മ് - म्, ഴ് - .ष्.)

वरील अर्धाक्षरांपैकी ल् ൽ हे अक्षर त ത या अक्षरासारखे दिसत असले तरी ते ल ല याचे अर्धाक्षर आहे व त ത चे नव्हे हे चांगले लक्षांत ठेवावे.

**जोडाक्षरे**: मलयाळम् लिपीत जोडाक्षरे ही ज्या दोन अक्षराच्या संयोगाने बनलेली असतात ती अक्षरे बहुतेक एकाखाली एक अगर एकापुढे एक अशी लिहिली जातात. पण याला अपवादरूप अशी जोडाक्षरे खूपच आहेत; व त्यांना स्वतंत्र अक्षरेच मानून ती चांगली लक्षांत ठेवणे जरूर आहे. म्हणून खाली नमून्यादाखल खूपच जोडाक्षरे दिली आहेत. त्यांचा चांगला अभ्यास केल्यास जोडाक्षराच्या लेखन वाचनाची अडचण दूर होईल.

## (अ) द्वित्ताक्षरे :-

| क्क | च्च | ट्ट | त्त | य्य | प्प | द्द |
|---|---|---|---|---|---|---|
| ക്ക | ച്ച | ട്ട | ത്ത | യ്യ | പ്പ | ദ്ദ |
| ब्ब | ल्ल | व्व | ञ्ञ | च्छ | त्थ | |
| ബ്ബ | ല്ല | വ്വ | ഞ്ഞ | ച്ഛ | ത്ഥ | |

[टीप ख ഖ, छ ഛ, ठ ഠ, थ ഥ, फ ഫ, या अक्षरांचे द्वित्ताक्षर लिहिताना पहिली अक्षरे अनुक्रमे क ക, च ച, ट ട, त ത, प പ, ही असतात. उदा. थ्थ हे थ ഥ് + थ ഥ = (थ्थ) ഥഥ असें मल्याळी लिपीत न लिहिता ते त ത് + थ ഥ = ത്ഥ (त्थ) असेच लिहितात]

| न्न | फ्फ | ण्ण | ख्ख | ग्ग | ट्ट |
|---|---|---|---|---|---|
| ന്ന | ഫ്ഫ | ണ്ണ | ഖ്ഖ | ഗ്ഗ | ട്ട |
| म्म | ङ्ङ | स्स | ळ्ळ | ज्ज | ट्ट़ |
| മ്മ | ങ്ങ | സ്സ | ള്ള | ജ്ജ | റ്റ |

[टीप :- येथील .र्.र याचा उच्चार ट्र होतो. पुढे टीप (६) पहा.]

(ब) जोडाक्षरे :-

| क्य | न्य | ज्य | ञ्य | ख्य | ग्य | घ्य | ङ्य |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ക്യ | ന്യ | ജ്യ | ര്യ | ഖ്യ | ഗ്യ | ഘ്യ | ങ്യ |
| च्य | ट्य | ठ्य | ड्य | ढ्य | ण्य | त्य | थ्य |
| ച്യ | ട്യ | ഠ്യ | ഡ്യ | ഢ്യ | ണ്യ | ത്യ | ഥ്യ |
| द्य | ध्य | प्य | भ्य | म्य | ल्य | व्य | श्य |
| ദ്യ | ധ്യ | പ്യ | ഭ്യ | മ്യ | ല്യ | വ്യ | ശ്യ |
| ष्य | स्य | ह्य | ळ्य | क्ष्य | प्र | ब्र | श्र |
| ഷ്യ | സ്യ | ഹ്യ | ള്യ | ക്ഷ്യ | പ്ര | ബ്ര | ശ്ര |
| क्र | घ्र | ज्र | ट्र | ड्र | त्र | द्र | ध्र |
| ക്ര | ഘ്ര | ജ്ര | ട്ര | ഡ്ര | ത്ര | ദ്ര | ധ്ര |
| भ्र | म्र | व्र | स्र | ह्र | र्क | र्द्द | र्ह |
| ഭ്ര | മ്ര | വ്ര | സ്ര | ഹ്ര | ൎക | ൎദ്ദ | ൎഹ |
| र्य्य | क्ल | म्ल | ब्ल | ग्ल | प्ल | फ्ल | श्ल |
| ൎയ്യ | ക്ല | മ്ല | ബ്ല | ഗ്ല | പ്ല | ഫ്ല | ശ്ല |
| स्ल | ह्ल | स्व | क्व | ज्व | ग्व | ण्व | त्व |
| സ്ല | ഹ്ല | സ്വ | ക്വ | ജ്വ | ഗ്വ | ണ്വ | ത്വ |

द्व ध्व श्व न्व ञ्ज ण्ट (उच्चार = ण्ड)

ദ്വ ധ്വ ശ്വ ന്വ ഞ്ജ ണ്ട

म्प (उच्चार = म्ब) ङ्क (उच्चार = ङ्ग) ञ्च (उच्चार = ञ्ज)

മ്പ ങ്ക ഞ്ച

न्द न्म न्त (उच्चार न्द) ण्क (उच्चार ण्ग) क्त

ന്ദ ന്മ ന്ത ണ്ക ക്ത

त्त श्च स्थ ग्द ग्न ग्म ध्द ह्न

ത്ത ശ്ച സ്ഥ ഗ്ദ ഗ്ന ഗ്മ ദ്ധ ഹ്ന

स्म ह्म ल्प ल्म ष्ट ष्ठ ग्ज ग्प

സ്മ ഹ്മ ല്പ ല്മ ഷ്ട ഷ്ഠ ഗ്ജ ഗ്പ

ह्ल ङ्म प्स ब्द ब्ध म्न य्त य्प

ഹ്ല ങ്മ പ്സ ബ്ദ ബ്ധ മ്ന ഴ്ത ഴ്പ

य्म य्प श्म ष्ण ष्प ष्म स्ख स्त

ഴ്മ ഴ്പ ശ്മ ഷ്ണ ഷ്പ ഷ്മ സ്ഖ സ്ത

स्न स्फ ह्न क्षण क्ष्म .ष्च .ष्त्त .ष्म

സ്ന സ്ഫ ഹ്ന ക്ഷണ ക്ഷ്മ ഴ്ച ഴ്ത്ത ഴ്മ

.ष्प क्न्य क्त्र क्त्र्य क्त्व ह्ल्य ह्व्य ष्ट्व

ഴ്പ ക്ന്യ ക്ത്ര ക്ത്ര്യ ക്ത്വ ഹ്ല്യ ഹ്വ്യ ഷ്ട്വ

ष्ठ्व ष्ट्य ष्ठ्य क्ष ज्ञ

ഷ്ഠ്വ ഷ്ട്യ ഷ്ഠ്യ ക്ഷ ജ്ഞ

टीपा :-

(१) मलयाळम् लिपीत अ അ ते अः അഃ असे पंधरा स्वर आहेत, व क ക ते .र റ अशी छत्तीस व्यंजने आहेत.

(२) मलयाळम् स्वरवर्णांमध्ये दोन ए (एक ऱ्हस्व व एक दीर्घ) व दोन ओ (एक ऱ्हस्व वएक दीर्घ) आहेत हे पूर्वी पहिल्या "विषय-प्रवेश" या प्रकरणात माहित झाले आहेच, व मलयाळम् ऱ्हस्व ए എ व मलयाळम् ऱ्हस्व ओ ഒ हे ए व ओ यांच्या वर एक उलटी मात्रा देऊन ऎ व ऒ असे या पुस्तकात लिहिले आहेत हेही तेथे सांगितले आहेच. येथे एक लक्षात ठेवण्याची गोष्ट म्हणजे ष् ഷ व ऱ् റ यांच्या ऱ्हस्व ए-कार रूपात एक टिंब येईल. (उदा० ഷെ .षे റെ .रे), व अन्य सर्व व्यंजनांच्या ऱ्हस्व ए-कार रूपात फक्त उलटी मात्रा येईल. (उदा. കെ कॆ, ടെ टॆ) ऱ्हस्व ओ-कार रूपाच्या बाबतीतही तसेच होईल.

(३) क ക, च ച, ट ട, त ത, प പ यांचे शब्दातील स्थान भेदा प्रमाणे प्रत्येकी दोन उच्चार आहेत हे मागे आलेच आहे. शब्दारंभी यांचे मूळचेच उच्चार राहातात. उदा. तवळ തവള यातील शब्दारंभीच्या त ത चा उच्चार त ത असाच होतो. पण अतुॅ അതു് व अतुकळ् അതുകൾ या शब्दातील त ത अनुक्रमे अंती व मध्ये असल्यामुळे त ത चा द असा उच्चार होऊन या शब्दाचे उच्चार अनुक्रमे अदुॅ व अदुगळ् असे होतात. पण नात्तून् നാത്തൂൻ या शब्दातील त ത शब्दारंभी नसून मध्ये आला असूनही तो द्वित्व पावला असल्यामुळे त्याचा मूळचाच उच्चार राहून या शब्दाचा उच्चार नात्तून् असाच होतो. तसेच काल् കാൽ, ताङ्कळ् താങ്കൾ, नाक्कुॅ നാക്കു് या शब्दांतील क ക चा उच्चार वरील नियमाप्रमाणेच होतो, म्हणजे या शब्दांचे उच्चार अनुक्रमे काल्, तांगळ् व नाक्कुॅ असे होतात. तसेच च ച च्या बाबत चुमल् ചുമൽ, नॆञ्चु നെഞ്ചു, व पिच्चक्कारन् പിച്ചക്കാരൻ या शब्दांचे उच्चार अनुक्रमे चुमल्, नॆञ्जु, व पिच्चक्कारन् असे होतात. तसेच ट ട च्या बाबतीत टिप्पणि ടിപ്പണി, कुटल् കുടൽ, व तट्टान् തട്ടാൻ या शब्दांचे

उच्चार अनुक्रमे टिप्पणि, कुडल् व तट्टान असे होतात. तसेच प ഫ च्या बाबतीतही पशु പശു, गोतम्पु ഗോതമ്പ व बाष्पषम् ബാഷ്പം या शब्दांचे उच्चार अनुक्रमे पशु, गोदम्बु, व वाष्पषम् असे होतात, पण सर्वसाधारणपणे परभाषीय शब्द व संस्कृत शब्दही मुळात त्यांचा उच्चार जसा असेल तसाच उच्चारावयाचा असतो, त्याना हे लागू नाही.

(४) मलयाळम् व्यंजनांमध्ये ष़ हा एक नवीन विशिष्ट उच्चाराचा जो वर्ण आहे त्याला ഴ हे स्वतंत्र अक्षर आहे, व त्याच्या उच्चारासंबंधीची माहिती पूर्वी "विषय-प्रवेश" या प्रकरणात येऊन गेलेलीच आहे.

(५) मलयाळम् व्यंजनांत दोन र आहेत, व त्यांच्यातील भेद या पुस्तकात खाली टिंब देऊन र ര व ऱ റ अशा प्रकारे दाखविला आहे हे पूर्वी "विषय प्रवेश" या प्रकरणात सांगितलेलेच आहे. तेथे त्यांच्या उच्चारासंबंधीही माहिती दिली आहे.

(६) दोन ऱ റ एकत्र आल्यास म्हणजे ऱऱ റ്റ असे आल्यास त्यांचा उच्चार ट़ असा होतो.

(७) मलयाळम् शब्दकोशाचा अकारानुक्रमबहुशः स्वर व व्यंजन यांच्या तत्त्यात मागे दाखविलेल्या अनुक्रमानुसार അ ते ऱ റ असा असतो. ज्ञ ജ്ഞ हे अक्षर स्वतंत्र असे कोणीच मानीत नाहीत. ते जोडाक्षर मानून शब्दकोशात ज ജ खाली दिले जाते. क्ष ക്ഷ व ट़ റ്റ यांना काहीजण स्वतंत्र अक्षरे मानतात, व ते क्ष ക്ഷ चा क्रम ळ ള च्या नंतर व ट़ റ്റ चा क्रम ऱ റ च्या नंतर लावतात. पण सर्वसाधारणपणे ही दोन्ही अक्षरे स्वतंत्र न मानता जोडाक्षर मानतात, व शब्दकोशात क्ष ക്ഷ हे क ക खाली व ट़ റ്റ हे ऱ റ खाली देतात.

(८) मलयाळम् वर्णमालेचा आणखी एक विशेष म्हणजे शब्दातील अंत्य अ चा उच्चार आ असा करतात, व आ चा उच्चार आणखीन थोडा दीर्घ आ असा करतात, म्हणजे अ व आ यांच्या उच्चारातील भेद हा ऱ्हस्व आ व दीर्घ आ यांच्या उच्चारातील भेदच होय. मराठीतील अ असा उच्चार मलयाळम् अंत्य अ चा नाही; पण लिहिण्यात मात्र अ असेच लिहितात. उदा. राध രാധ असे लिहून राधा असा उच्चार करतात. सीत സീത असे लिहून सीता असा उच्चार करतात. अ चा हा उच्चार मराठी वाचकांना सुरुवातीस चमत्कारिक वाटेल. पण नंतर त्याची सवय झाल्यावर त्याचा चमत्कारिकपणा जाणवणार नाही.

पुढील 'मलयाळम् लिपीत वाचन' यामधील सर्व वाक्ये पुढे आलेलीच आहेत व त्यांचा अर्थ पुढे कळेलच. येथे ती वाक्ये मलयाळम् लिपीतील वाचनाचा फक्त नमुना म्हणून मराठी लिप्यंतर व मराठीत उच्चार यासह येथे दिलेली आहेत. अर्थाच्या दृष्टीने ती वाक्ये दिलेली नाहीत. या पुस्तकात मराठी अर्थ व मराठीत उच्चार यासह मलयाळम् लिपीत दिलेला असा भाग खूपच असल्यामुळे, व तो सर्व मलयाळम् लिपीतील वाचनाचा सराव करण्यासाठी उपयोग करता येण्यासारखा असल्यामुळे, येथे थोडीच वाक्ये फक्त वाचनाचा नमुना म्हणून दिलेली आहेत.

## मलयाळम् लिपीत वाचन

| मलयाळम् लिपी | मराठी लिप्यंतर | मराठीत उच्चार |
|---|---|---|
| १ നമസ്തേ. | नमस्ते. | नमस्ते. |
| २ കാപ്പികുടിക്കുക. | काप्पि कुटिक्कुक. | काप्पि कुडिक्कुग. |
| ३ കാപ്പിവേണ്ട. | काप्पि वेण्ट. | काप्पि वेण्ड. |
| ४ ടീ വേണമോ? | टी वेणमो ? | टी वेणमो ? |
| ५ ടീ വേണ്ട, പാൽ വേണം | टी वेण्ट, पाल् वेणम्. | टी वेण्ड, पाल् वेणम्. |
| ६ അവൻ ആർ? | अवन् आर्. | तो कोण ? |
| ७ അവൻ രാമൻ. | अवन् रामन्. | अवन् रामन्. |
| ८ അവൻ അവിടെ പോകുന്നു. | अवन् अवि.टे पोकुन्नु. | अवन् अविडे. पोगुन्नु. |

| मल्याळी लिपी | मराठी लिप्यंतर | मराठीत उच्चार |
|---|---|---|
| ९ ഗോപാലൻ അധ്യാപകൻ ആകുന്നു. | गोपालन् अध्यापकन् आकुन्नु. | गोपालन् अध्यापकन् आगुन्नु. |
| १० അവൻ കസേരമേൽ ഇരിക്കുന്നു | अवन् कसेरमेल् इरिक्कुन्नु. | अवन् कसेरमेल् इरिक्कुन्नु. |
| ११ രാമൻ പുസ്തകം വായിക്കുന്നു | रामन् पुस्तकम् वायिक्कुन्नु. | रामन् पुस्तकम् वायिक्कुन्नु. |
| १२ അവനു് അതു് പിടിക്കുന്നു. | अवनुँ अतुँ पिटिक्कुन्नु. | अवनु अदुँ पिडिक्कुन्नु. |
| १३ രാമൻ പഠിക്കുന്നു. | रामन् पठिक्कुन्नु. | रामन् पठिक्कुन्नु. |
| १४ ഗോപാലൻ പഠിപ്പിക്കുന്നു. | गोपालन् पठिप्पिक्कुन्नु. | गोपालन् पठिप्पिक्कुन्नु. |
| १५ ഇപ്പോൾ മലയാളഭാഷാ-വ്യാകരണം നന്നായി പഠിക്കുക. | इप्पोळ् मलयाळ भाषा व्याकरणम्– नन्नायि पठिक्कुक. | इफोळ् मलयाळभाषाव्याकरणम् नन्नायि पठिक्कुग. |
| १६ ശരി, നല്ലതു. | शरि, नल्लतु | शरि, नल्लयु. |

# ३ मलयाळम् व्याकरण परिचय

या अल्प 'व्याकरण परिचयात' मलयाळम् भाषेचे व्याकरण जेथे मराठी प्रमाणेच आहे अगर मराठी व्याकरणाच्या सामान्य ज्ञानाच्या सहायाने सहज ताडता येण्यासारखे आहे अशा गोष्टींचा येथे उल्लेख केलेला नाही. जेथे मराठी व्याकरणाहून विशेष भिन्नता असल्यामुळे मराठी वाचकांनी विशेष लक्षात ठेवण्यासारख्या ज्या गोष्टी आहेत तेवढ्याचाच येथे उल्लेख केलेला आहे.

मलयाळम् व्याकरण मराठी वाचकांच्या दृष्टीने पुढे दिलेल्या बाबतीत सोपे वाटेल:-

(१) मलयाळम् संधि नियम मराठी वाचकांना फारसे अपरिचित वाटणार नाहीत.

(२) मलयाळम् वाक्यरचनाही मराठी वाचकांस अपरिचित वाटणार नाही.

(३) मलयाळम् विशेषणे मराठी वाचकांस सोपी वाटतील.

(४) मलयाळम् नामांचे लिंगभदही मराठी वाचकांस सोपे वाटतील.

(५) नामांची व सर्वनामांची विभक्तिरूपे व क्रियापदांच्या काळार्थाची रूपे या बाबतचा मलयाळम् व्याकरणाचा भागही मराठी वाचकांस सोपाच वाटेल.

(६) अव्यये ही नेहमीच अविकारी असतात. तशी ती मलयाळम् भाषेतही आहेत, व त्याबाबतही मलयाळम् भाषेचा विशिष्ट असा कांही अवघडपणा नाही. यावरून एकंदर मलयाळम् व्याकरण मराठी वाचकांस फारसे अवघड नाही हे स्पष्ट दिसेल. ज्या अर्थाने मलयाळम् व्याकरणाचा सोपेपणा वर नमूद केला आहे, त्या अर्थाने तो सोपेपणा खालील व्याकरणात त्या त्या विशिष्ट ठिकाणी स्पष्ट केला जाईल. म्हणून त्याची पुनरुक्ति येथे टाळून वाचकांस फक्त सोपेपणा कोठे आढळेल व एकंदर व्याकरण किती सोपे आहे याचे वर केवळ दिग्दर्शन मात्र केले आहे.

आता मलयाळम भाषेच्या अवघडपणाकडे वळू :-

(१) मलयाळम् भाषेच्या शब्दसंग्रहातील द्राविडी भाग हा मराठी वाचकांस जाणवणारा असा एक विशेष अवघड विषय आहे. हा द्राविडी भाग मराठी वाचकांस फारच अपरिचित वाटेल, व या द्राविडी शब्दसंग्रहाच्या जडणघडणीसंबंधीचा भागही सोपा वाटणार नाही.

(२) शिवाय मलयाळम् लिपी हाही एक मोठा अवघड विषय आहे. मलयाळम् व मराठी अक्षरात कांहीही साम्य नाही. यामुळे विशेष परिश्रमाने ती शिकणे भाग आहे. मलयाळम् लिपीत मराठीतले सर्व स्वर व व्यंजने यांची अक्षरे आहेतच, आणि त्याशिवाय मलयाळम्चे कांही विशिष्ट अन्यही जे वर्ण आहेत त्यांचीही अक्षरे आहेत. ही सर्व मलयाळम् अक्षरे शिकलीच पाहिजेत. याशिवाय मलयाळम्मध्ये अनियमितपणे बनणारी जोडाक्षरेही विपुल आहेत. म्हणून ती देखील स्वतंत्र अक्षरेच समजून शिकणे भाग आहे. यातच आणखीन एक अडचण म्हणजे मलयाळम् क ക, च ച, ट ട, त ത, प പ या व्यंजनांचे शब्दातील स्थानभेदाप्रमाणे उच्चार बदलतात. यामुळे मलयाळम लिपीतील

वाचन थोडेसे अवघड झालेले आहे. याचा विशेष खुलासा मागे मलयाळम् लिपीचा परिचय करून दिला आहे त्या प्रकरणात सविस्तर येऊन गेलेलाच आहे.

(३) उच्चार व संधि हाही भाग थोडासा सुरुवातीस मराठी वाचकांस सोपा वाटला तरी त्याच्या पुढे सखोल व शास्त्रशुध्द अभ्यासाच्या दृष्टीने तो थोडा अवघडच वाटेल. मलयाळम् भाषेत संधीचे विशेष प्राचुर्य आढळेल व मलयाळम् संधींची खास वैशिष्टये ही आहेत आणि ती अवघडही आहेत. व्यावहारिक ज्ञानाच्या दृष्टीने यात फारसे शिरण्याचे मराठी वाचकांस कारण नाही. पण शास्त्रशुध्द अभ्यासाच्या दृष्टीने यात शिरावेच लागेल, व विशेष अभ्यासासाठी हा भाग समजून घेणे भागच आहे.

(४) या शिवाय मलयाळम्चे काही विशेष वाक्प्रचार व मोडणी हा देखील बराच अवघड भाग आहे. पण तो व्यावहारिक ज्ञानाच्या बाबतीत फारसा आड येणारा नाही. सखोल शास्त्रशुध्द अभ्यासात मात्र त्याची विशेष दखल घेऊन तो भाग आत्मसात करणे जरूरच आहे. परंतु या अडचणी व्यावहारिक भाषेबाबत तर फारशा भासणारच नाहीत. शिवाय शास्त्रशुध्द अभ्यासाच्या दृष्टीनेही प्रथमदर्शनी जरी या अडचणींची फार भीति वाटली, तरी थोडासा परिचय झाल्यानंतर या अडचणींचा तितकासा बाऊ वाटणार नाही. म्हणून एकदम डोंगरास कासरा घालून हलविण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा प्रथम व्यवहारिककाम चलाऊ ज्ञान हस्तगत करणे सामान्य माणसाच्या व्यवहारी दृष्टीनेच नव्हे, तर सखोल अभ्यासकाच्या दृष्टीनेही योग्य ठरेल; कारण एकाद्या अवघड विषयाच्या अभ्यासाचा सर्व भाग एकदम अंगावर घेण्यापेक्षा पायरी पायरीने त्या अवघडपणावर मात करणे सोपे असते. या अवघडपणावर कोणकोणत्या टप्प्यानी प्रगती करून विजय मिळवावयाचा याबाबत वेगवेगळ्या भाषाशिक्षकांच्या वेगवेगळ्या भाषा शिकण्यातील अनुभवावरून मतभेद होतील. अर्थात्, हा तितकासा शास्त्रीय प्रश्न नसून व्यवहाराचा व अनुभवाचा प्रश्न आहे. ज्याच्या अनुभवात जशा पायऱ्या सोप्या वाटल्या तशाच पायऱ्या तो पाडील.

या प्राथमिक चर्चेवरून मलयाळम् भाषेच्या व्यवहारी अभ्यासाच्या व शास्त्रशुध्द अभ्यासाच्या दृष्टीने काय सोपे व काय अवघड आहे, याची वाचकांस आता कल्पना आली असेल. आता आपण या पुस्तकातील उद्देशाच्या दृष्टीने मलयाळम् व्याकरणाच्या अभ्यासाकडे वळू.

## नामविचार

मलयाळम्मध्ये मराठीप्रमाणे पुल्लिंग, स्त्रीलिंग, व नपुंसकलिंग अशी तीन लिंगे आहेत. पण मराठीप्रमाणे मलयाळम्मध्ये लिंग ओळखणे बिलकूल अवघड नाही. पुरुष पुल्लिंग, स्त्री स्त्रीलिंग, व इतर सर्व नपुंसकलिंग

उदा० रामन् രാമൻ [पु.] (रामन्), सीत സീത [स्त्री.] सीता, व मरम् മരം [न.] (झाड). मराठीत 'घोडा' पुल्लिंगी आहे; पण मलयाळममध्ये 'कुतिर' കുതിര (घोडा) नपुंसकलिंगी आहे. मराठीत 'गाय' ही स्त्रीलिंगी आहे; तर मलयाळममध्ये 'पशु' പശു (गाय) नपुंसकलिंगी आहे.

मलयाळम्मध्ये मराठीप्रमाणेच एकवचन व अनेकवचन अशी दोन वचने आहेत. पण मराठीप्रमाणे मलयाळम्मध्ये अनेकवचनाची भिन्न भिन्न रूपे नाहीत
उदा० घोडा (ए. व.) घोडे (अ.व.); बैल (ए.व.) बैल (अ.व.); गाय (ए.व.) गाई (अ.व.); पण मलयाळम्मध्ये

| (ए.व.) | (अ.व.) |
|---|---|
| कुतिर കുതിര [घोडा] | कुतिरकळ् കുതിരകൾ [घोडे] |
| काळ കാള [बैल] | काळकळ् കാളകൾ [बैल] |
| पशु പശു [गाय] | पशुकळ् പശുകൾ [गाई] |

मलयाळममध्ये नामांच्या अनेकवचनाचा प्रत्यय-कळ् കൾ हा आहे.

उदा० वरील कुतिरकळ् കുതിരകൾ [घोडे], काळकळ् കാളകൾ [बैल], पशुकळ् പശുകൾ [गाई] ही सर्व कळ् കൾ प्रत्ययान्त अनेकवचने आहेत. फक्त न् ൻ अक्षरान्त्य पुल्लिंगी नामाच्या अनेकवचनी वेगळा प्रत्यय येतो. हा वेगळा प्रत्यय-मार् മാർ असा आहे.

उदा० (ए. व.) (अ. व.)

चेरुक्कन् ചെറുക്കൻ चेरुक्कन्मार् ചെറുക്കൻമാർ
(मुलगा) (मुलगे)

मनुष्यन् മനുഷ്യൻ मनुष्यन्मार् മനുഷ്യൻമാർ
(मनुष्य, माणूस) (माणसे)

न् ൻ अक्षरान्त्य नामांना-अर् അർ प्रत्यय जोडूनही अनेकवचन बनवितात.

उदा० (ए.व.) (अ.व.)

पुरुषन् പുരുഷൻ (पुरुष) पुरुषर् പുരുഷർ (पुरुष)

मनुष्यन् മനുഷ്യൻ (मनुष्य, माणूस) मनुष्यर् മനുഷ്യർ (मनुष्यजात, मानवजात)

वरील सर्व अनेकवचनाची प्रत्यये आदरार्थीही वापरतात, व जास्त आदर व्यक्त करण्यासाठी दोन अनेकवचनी प्रत्यये — कळ् കൾ व — मार् മാർ ही एकाच वेळी लावतात—

उदा. (ए.व.) (आदरार्थी अ.व.)

भीष्म ഭീഷ്മ भीष्मर् ഭീഷ്മർ

गुरु ഗുരു गुरुकळ् ഗുരുകൾ

(ए.व.) (बहु आदरार्थी अ.व.).

गुरु ഗുരു गुरुक्कन्मार् ഗുരുക്കൻമാർ
(गुरु ഗുരു+कळ् കൾ+मार् മാർ)

तुँ ഉ॰ अक्षारान्त्य नपुंसकलिंगी नामांचे अनेकवचन दोन प्रकारे होते. एक प्रकार म्हणजे नेहमीप्रमाणे कळ കൾ प्रत्यय लावून अनेकवचन बनवितात, व दुसऱ्या प्रकारात तुँ ഉ॰ चा 'व' വ करतात.

उदा०  (ए.व.)

नल्लतु നല്ലതു് (चांगली गोष्ट)

(अ.व.)

नल्लतुकळ് നല്ലതുകൾ किंवा नल्लव നല്ലവ (चांगल्या गोष्टी).

मराठीप्रमाणे मलयाळम्‌मध्ये प्रथमा ते संबोधन या सर्व विभक्ती आहेत, व प्रथमेखेरीज अन्य सर्व विभक्तींचे निरनिराळे स्वतंत्र प्रत्यय आहेत. पण हे विभक्तिप्रत्यय नामांच्या लिंगवचनाप्रमाणे बदलत नाहीत. नामाला सर्व लिंगी व सर्व वचनी तेच प्रत्यय लागतात. मलयाळम् भाषेतील विभक्तिप्रत्यय खालीलप्रमाणे आहेत.

(१) प्रथमा या विभक्तीचा स्वतंत्र प्रत्यय नाही.

(२) द्वितिया विभक्तीचा प्रत्यय - अं എ आहे.

(३) तृतिया विभक्तीचा प्रत्यय -आल् ആൽ आहे.

(४) चतुर्थी विभक्तीचे प्रत्यय -क्कु ക്കു്, नु നു, न्नु ന്നു, असे तीन प्रत्यय आहेत.

(५) पंचमी विभक्तीचा प्रत्यय -इल्निन्नु ഇൽനിന്നു് आहे.

(६) षष्ठी विभक्तीचे -उटे ഉടെ व -न्टे ന്റെ असे प्रत्यय आहेत.

(७) सप्तमी विभक्तीचे -इल् ഇൽ, त्तु ത്തു, कल् -കൽ असे प्रत्यय आहेत.

(८) संबोधन विभक्तीचा प्रत्यय आ-ആ आहे. याशिवाय तृतिया विभक्तीचा -ओटु ഓട असा आणखीन एक प्रत्यय आहे, व त्याचा खरा अर्थ मराठी -'बरोबर'च्या समानार्थक असा होईल; तसेच चतुर्थीचा -आयि-क्कोण्टु ആയിക്കൊണ്ട असा आणखीन एक प्रत्यय आहे, व त्याचा खरा अर्थ मराठी -'साठी'च्या समानार्थक असा होईल. हे तृतिया व चतुर्थी या विभक्तींचे जादा प्रत्यय त्यांच्या मलायळम् स्वरूपात जरी विभक्तिप्रत्ययरूप असले तरी ते मराठी अर्थाच्या दृष्टीने मराठी वाचकांस मराठी शब्दयोगी अव्ययाप्रमाणे भासतील.

वरील सर्व विभक्तिप्रत्ययांचे अर्थ व त्यांचे वाक्यातील स्थान व कार्य साधारणपणे मराठीतील विभक्तिप्रत्ययाप्रमाणेच आहेत.

उदा०

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथमा: | रामन् | രാമൻ | रामन् |
| द्वितिया: | रामनॆ | രാമനെ | (रामन् രാമൻ+अॆ എ) रामाला |
| तृतिया: | रामनाल् | രാമനാൽ | (रामन् രാമൻ+आल् ആൽ) रामाकडून |
| चतुर्थी: | रामनॅु | രാമനു് | (रामन् രാമൻ+नॅु നു്) रामाला |
| पंचमी: | रामनिल्निन्नु | രാമനിൽനിന്നു | (रामन्+രാമൻ+ इल्निन्नु ഇൽനിന്നു) रामापासून |
| षष्ठी: | रामन्टॆ | രാമന്റെ | (रामन् രാമൻ+न्टॆ ന്റെ) रामाचा, ची, चे |
| सप्तमी: | रामनिल् | രാമനിൽ | (रामन् രാമൻ+इल् ഇൽ) रामात, रामामध्ये |
| संबोधन: | रामा | രാമാ | (रामन् രാമൻ+आ ആ) हे रामा! |

तृतियेचा जादा प्रत्यय :

रामनोटु രാമനോട് (रामन् രാമൻ+ ओटु ഓട്) रामाबरोबर

चतुर्थीचा जादा प्रत्यय :

रामानायिक्कोण्टु രാമനായിക്കൊണ്ടു് (रामन् രാമൻ+आयिक्कोण्टॅु ആയിക്കൊണ്ടു്) रामासाठी

या उदाहरणांवरून मलयाळम् विभक्तिप्रत्ययांच्या अर्थाची वाचकांस कल्पना येईल. वरील तेच विभक्तिप्रत्यय त्याच अर्थानि कोणत्याही नामास-ते नाम कोणत्याही लिंगाचे अथवा कोणत्याही वचनाचे असो मलयाळम्‌मध्ये जोडतात. यात कांहींही फरक होत नाही.

उदा०

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. ए. व. | सीत | സീത | सीता |
| -द्वि. ए. व. | सीतयॆ | സീതയെ | सीतेला |
| प्र. ए. व. | अरि | അരി | तांदूळ |
| द्वि. ए. व. | अरियॆ | അരിയെ | तांदूळास |
| प्र. ए. व. | तॆरुवुँ | തെരുവ് | गल्ली |
| द्वि. ए. व. | तॆरुविनॆ | തെരുവിനെ | गल्लीस |
| प्र. ए. व. | वीटु | വീട് | घर |
| -द्वि. ए. व. | विट्टॆ | വീട്ടെ | घरास |
| प्र. ए. व. | मरम् | മരം | झाड |
| द्वि. ए. व. | मरत्तॆ | മരത്തെ | झाडास |
| प्र. ए. व. | मनुष्यन् | മനുഷ്യൻ | मनुष्य; माणूस |
| द्वि. ए. व. | मनुष्यनॆ | മനുഷ്യനെ | मनुष्यास, माणसास |
| प्र. अ. व. | मरङ्कळ् | മരങ്കൾ | झाडे |
| द्वि. अ. व. | मरङ्कळॆ | മരങ്കളെ | झाडांना |
| प्र. अ. व. | चॆरुक्कन्मार् | ചെറുക്കൻമാർ | मुलगे |
| द्वि. अ. व. | चॆरुक्कान्मारॆ | ചെറുക്കൻമാരെ | मुलांना |
| प्र. अ. व. | मनुष्यन्मार् | മനുഷ്യൻമാർ | माणसे |
| द्वि. अ. व. | मनुष्यन्मारॆ | മനുഷ്യൻമാരെ | मानवजातीस |

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. अ. व. | वीट्टुकळ् | വീടുകൾ | घरे |
| द्वि. अ. व. | वीट्टुकळे | വീടുകളെ | घरांना |
| प्र. अ. व. | पुत्रिकळ् | പുത്രികൾ | मुली |
| द्वि. अ. व. | पुत्रिकळे | പുത്രികളെ | मुलींना |

या सर्व व्दितियेच्या दोन्ही वचनी व तीन्ही लिंगी उदाहरणांवरून वाचकांस आता कल्पना येईल की द्वितियेचा 'ऍ' എ प्रत्यय सर्वत्र सारखाच आहे. याबाबत मल्याळम् व्याकरणात अडचण कांहींच नाही. हीच गोष्ट बाकी सर्व विभक्तींच्या प्रत्ययांना लागू आहे. पण वरील द्वितियेच्या उदाहरणांवरून दुसरी एक गोष्ट वाचकांच्या लक्षात आली असेल, व ती म्हणजे कांही ठिकाणी प्रथमेचे रूप व्दितियेचा प्रत्यय लागण्यापूर्वी तसेच राहाते व कांहीं वेळा द्वितियेचा प्रत्यय लागण्यापूर्वी बदलते. शिवाय आणखीन एक गोष्ट येथे लक्षात ठेवण्या-सारखी म्हणजे व्दितियेचा प्रत्यय लागण्यापूर्वी जेव्हा प्रथमेचे रूप बदलते ते फक्त एकवचनी रूपांतच बदलते, पण अनेकवचनी रूपांत बदलत नाही.

उदा.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. .ए. व. | मरन् | മരം | झाड |
| द्वि. ए. व. | मरत्ते | മരത്തെ | झाडास |
| पण प्र. अ. व. | मरङ्कळ् | മരങ്ങൾ | झाडे |
| द्वि. अ. व. | मरङ्कळे | മരങ്ങളെ | झाडांना |

मलयाळम् विभक्तीच्या विषयी जी खरी अडचण आहे ती येथे आहे, व ती अडचण म्हणजे मलयाळम् शब्दांच्या एकवचनी प्रथमेच्या रूपात अन्य विभक्तिरूपातील एकवचनी प्रथमेतर विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वी होणारा बदल, म्हणजेच प्रथमेचे रूप व सामान्य रूप (ज्या रूपाला विभक्तिप्रत्यय लावतात ते) यातील फरक, ही होय. या अडचणीतून एक सोपा मार्ग म्हणजे कांही नमूनेवजा उदाहरणे लक्षात ठेवणे. शिवाय दुसरा एक मार्ग म्हणजे मराठी वाचकांनी मराठी संधींचे नियम लक्षात आणावेत, म्हणजे मलयाळम् भाषेतील नामाच्या मूळरूपात व सामान्यरूपात आढळणाऱ्या फरकाचा बराचसा ठोकळ उलगडा होईल. येथे कांहीं उदाहरणे देत आहे ती लक्षपूर्वक पाहून ठेवावीतः—

